वाहन आढावा:-

**अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, पालघर या पदासाठी वाहन अनुज्ञेय करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक-वाखदु-१४१८/प्र.क्र.२४२/ राउशु-१**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक:-१३ फेब्रुवारी, २०१९.

**वाचा:**

१) शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग, क्र.प्राफेब ११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दि.३१.०७.२०१४.

२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.वाहन-२०१२/प्र.क्र.४१/राउशु-१, दि.०७.०२.२०१५.

३) शासन निर्णय, गृह विभाग क्र.इएसटी-१७१४/प्र.क्र.५०/राउशु-१, दि.२०.११.२०१५.

**शासन निर्णय:**

ठाणे जिल्ह्यातील काही तालुक्यांचा मिळून पालघर हा नवीन जिल्हा दि.०१.०८.२०१४ पासून अस्तित्वात आलेला आहे. त्यानुषंगाने नवनिर्मित पालघर जिल्ह्याच्या अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क कार्यालयासाठी संदर्भाधीन दि.२०.११.२०१५ च्या शासन निर्णयान्वये पदनिर्मिती केली आहे. त्यामध्ये अधीक्षक (गट-अ), राज्य उत्पादन शुल्क या पदाची निर्मिती करण्यात आली आहे.

२. राज्य उत्पादन शुल्क विभागातील विविध पदांकरिता वाहन अनुज्ञेय ठरविणेबाबत दि.०७.०२.२०१५ रोजी शासन निर्णय निर्गमित केला असून त्यामध्ये अधीक्षक (गट-अ), राज्य उत्पादन शुल्क या पदास वाहन अनुज्ञेय ठरविले आहे. तरी, राज्य उत्पादन शुल्क विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील सर्व कार्यरत/निर्लेखित वाहनांची नोंद महावाहन संगणक प्रणालीवर तातडीने करण्याच्या अटीच्या अधीन राहून, नवनिर्मित पालघर जिल्ह्यातील अधीक्षक (गट-अ), राज्य उत्पादन शुल्क, पालघर या पदाकरिता एक वाहन (कार) अनुज्ञेय करण्यास, सदर शासन निर्णयान्वये, मंजूरी देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६/१९/विनियम, दि.०२.०२.२०१९ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०२१३११५०४६०१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji Baburao Chavan

Digitally signed by Shivaji Baburao Chavan
DN: CN = Shivaji Baburao Chavan, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2019.02.13 12:02:35 +05'30'

**( शिवाजी चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

२) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, कोकण विभाग, ठाणे.
४) अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, ठाणे/ पालघर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर.
६) वित्त विभाग (विनियम/व्यय-८ शाखा), मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती (राउशु-१)

**************